**डॉ. अनिल श्रीधर नाईक, वैद्यकीय अधिकारी,**
**<u>गट-अ यांच्या स्वेच्छा सेवानिवृत्तीबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन आदेश क्रमांकः स्वेसेनि-२०२०/प्र.क्र.४४४/सेवा-३.
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, संकुल इमारत, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: १७ मार्च,२०२२.

वाचा :- सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/२ब/डॉ. नाईक/स्वेसेनि/जा.क्र.९८९/२१, दि.१३.१०.२०२१.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, वैद्यकीय अधिकारी गट-अ या संवर्गातील (वेतनस्तर S-२० : ५६१००-१७७५००) या मध्ये कार्यरत असलेल्या डॉ. अनिल श्रीधर नाईक, वैद्यकीय अधिकारी, गट-अ, सामान्य रुग्णालय खामगाव, जि. बुलढाणा यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारस होऊन, सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय दि.२१.११.१९९५ अन्वये नामनिर्देशनाने नियुक्ती झाली आहे. डॉ. अनिल श्रीधर नाईक, यांनी म.ना.से. (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ मधील नियम क्र. ६६ (१) मधील तरतुदीनुसार २० वर्षाची अर्हताकारी सेवा पूर्ण केलेली असल्याने, तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ६६ (५) नुसार डॉ. अनिल श्रीधर नाईक यांनी स्वेच्छा सेवानिवृत्तीची नोटीस विहित कालावधीत मागे न घेतल्याने, म.ना.से. (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ६६ (२) नुसार डॉ. अनिल श्रीधर नाईक हे आपोआपच स्वेच्छा सेवानिवृत्तीच्या नोटीशीच्या समाप्तीच्या दिनांकास स्वेच्छा सेवानिवृत्त (Deemed to retire) झाले आहेत. सबब, डॉ. अनिल श्रीधर नाईक यांनी दि.३०.०९.२०२० च्या अर्जान्वये दिलेली स्वेच्छा सेवानिवृत्तीची सूचना स्विकारण्यात आली असून, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ मधील नियम ६६ (१) (२) (५) मधील तरतुदींनुसार डॉ. अनिल श्रीधर नाईक, वैद्यकिय अधिकारी, गट-अ, या दि.३०.१२.२०२० (म.पू.) पासून स्वेच्छेने सेवानिवृत्त झाले असल्याचे घोषित करण्यात येत आहे.

२. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१७११०७२०९०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.03.17 11:29:10 +05'30'

**( वि. ल. लहाने )**
**शासनाचे सह सचिव.**

**प्रत,**

१) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखारीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
४) उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ अकोला.
५) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, बुलढाणा.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा.
७) डॉ. अनिल श्रीधर नाईक, वैद्यकिय अधिकारी यांना (उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला यांचे मार्फत)
८) निवडनस्ती सेवा-३.